**राज्य मानसिक आरोग्य प्राधिकरण व ०८ ठिकाणी कार्यरत जिल्हा मानसिक आरोग्य आढावा मंडळाच्या विविध बाबींवरील खर्च भागविण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडणेबाबत..**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२३/प्र.क्र.१०/आरोग्य ३अ

गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक : २८ मार्च , २०२३

**वाचा :-** संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्रमांक : आआसे/माआ/टे-२/नवीन लेखाशीर्ष/२०२३/२८११ दिनांक १८.०१.२०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने मानसिक आरोग्य अधिनियम, २०१७ लागू केला असून त्याअंतर्गत दिनांक २० ऑक्टोबर, २०१८च्या अधिसूचनेनुसार राज्यामध्ये " राज्य मानसिक आरोग्य प्राधिकरण " गठीत करण्यात आले आहे. तसेच दिनांक २३ ऑक्टोबर, २०१८ च्या शासन निर्णयानुसार, राज्य मानसिक आरोग्य प्राधिकरणावर नामनिर्देशित सदस्यांची नियुक्ती करण्यात आली होती. सदर राज्य मानसिक आरोग्य प्राधिकरणावरील नामनिर्देशित सदस्यांची मुदत ०३ वर्षाकरीता होती. तदनंतर दिनांक ०६ सप्टेंबर, २०२२ रोजीच्या शासन निर्णयानुसार सदर प्राधिकरणावर अशासकीय सदस्याची नियुक्ती करण्यात आली होती. तसेच मानसिक आरोग्य अधिनियम, २०१७ मधील खंड ७३ नुसार “जिल्हा मानसिक आरोग्य आढावा मंडळ” स्थापन करण्याबाबतची तरतूद आहे. त्यानुसार मानसिक आरोग्य कायदा, २०१७ ची राज्यामध्ये अंमलबजावणी करणेच्या दृष्टीने ठाणे, पुणे, नागपूर, कोल्हापूर, औरंगाबाद, लातूर, अकोला, नाशिक या ८ ठिकाणी जिल्हा मानसिक आरोग्य आढावा मंडळ (MHRB) स्थापन करण्यासाठी अधिसूचना निर्गमित करण्यात आलेली आहे. राज्य मानसिक आरोग्य प्राधिकरण

व ०८ ठिकाणी कार्यरत जिल्हा मानसिक आरोग्य आढावा मंडळाच्या विविध बाबींवरील खर्च भागविण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

राज्य मानसिक आरोग्य प्राधिकरण व ०८ ठिकाणी कार्यरत जिल्हा मानसिक आरोग्य आढावा मंडळाच्या विविध बाबींवरील खर्च भागविण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

| लेखाशीर्ष | लेखाशीर्षाचे मराठी नाव | लेखाशीर्षाचे इंग्रजी नाव |
|---|---|---|
| मागणी क्रमांक | आर-०१ | R-01 |
| प्रधान लेखाशीर्ष | २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य | 2210-MEDICAL AND PUBLIC HEALTH |
| उप-प्रधान लेखाशीर्ष | ०१-नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा | 01-Urban Health Services - Allopathy |
| गौण शीर्ष | २००-इतर आरोग्य योजना | 200-Other Health Schemes |
| गट शीर्ष | ०१-मानसिक आरोग्य | 01-Mental Health |
| उपशीर्ष | ०१-राज्य मानसिक आरोग्य प्राधिकरण (अनिवार्य) | 01-State Mental Health Authority (Committed) |
| संगणक संकेतांक | २२१०J९९४ | 2210J994 |

२. सदर लेखाशिर्षांतर्गत दोन अंकी संकेतांक उद्दिष्टशिर्षे ही दिनांक १०.०८.२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये परिशिष्ट अ मधील उद्दिष्टशिर्षांच्या सूचीनुसार असतील.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११४/ व्यय-१३, दिनांक ०२.०३.२०२३ अन्वये व महालेखापाल १ ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, मुंबई यांच्या अनौपचारिक

संदर्भ क्रमांक सं: ख. वि / चा-१/ सा आ विभाग/ यू ओ आर- १७६/२०२२-२३/९९८, दिनांक १४.०२.२०२३ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२८१२२२११९५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.03.28 17:06:15 +05'30'

( अ. मा. आत्राम)

सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/ २, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक (१), आरोग्य सेवा, मुंबई.
४. अतिरिक्त संचालक (मानसिक आरोग्य), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा सर्व
६. वैद्यकीय अधिक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय, पुणे/ठाणे/नागपूर/रत्नागिरी
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
८. अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव ( कार्यासन ६व्यय-१३/अर्थ-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती (आरोग्य-३ अ).